२०११०१११७४९३०००१

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका.

महानगरपालिकेच्या वतीने संविदा करण्याच्या संदर्भात आयुक्तांच्या आर्थिक अधिकारात वाढ करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: जीईएन-१०८९/१७५७/प्र.क्र.३८/नवि-२२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २० सप्टेंबर, १९९०.

पहा :- आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे क्र.प्रशा-१/१३१/९०, दिनांक ११.६.१९९० चे पत्र.

शासन निर्णय :- मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ७३ खंड [क] मध्ये अशी तरतुद आहे की, "ज्यांत ५ हजार रुपयांहून अधिक किंवा [राज्य] शासनाच्या मंजुरीने महानगरपालिका वेळोवेळी विहित करील अशा त्याहून अधिक असणाऱ्या रकमेपेक्षा अधिक खर्च अंतर्भूत असेल अशा कोणत्याही संविधेस स्थायी समितीने आधी मान्यता दिल्याशिवाय आयुक्ताने अशी कोणतीही संविधा करता कामा नये."

२. पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने वरील तरतुदी अन्वये शासनाकडे प्रस्ताव सादर केला आहे की, संविधेच्या खर्चाची रक्कम पाच हजारापेक्षा अधिक रक्कम म्हणजे रुपये एक लाख अशी विहित करण्यास शासनाने मंजुरी दयावी.

३. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ७३ चे खंड [क] अन्वये प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन शासन याव्दारे, संविधेच्या खर्चाची रक्कम रुपये एक लाख विहित करण्याच्या पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या प्रस्तावास मंजुरी देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ मा. प. पटवर्धन ]
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव.

प्रति,

आयुक्त,
पिंपरी-चिंचवड महानगरपालिका,
पिंपरी-४११ ०१८.